थोर राष्ट्रीय पुरुषांची चरित्रे प्रकाशित करण्यासाठी मुख्य लेखाशिर्ष २२०५३६२६,१६- प्रकाशने या उद्दीष्टामध्ये पुनर्वितरणाव्दारे निधी उपलब्ध करणे बाबत

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र. ३९ /अर्थसंकल्प (विघयो)

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २ एप्रिल, २०२५

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५ वदि.१७.०३.२०२५

२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग नस्ती क्र.एचटिइडि २७०१०/४०/२०२५-एमएचटि (एचई-२)

३) या विभागाचे ज्ञापन क्रमांक - बीजीटी २०२४/प्र.क्र. ३९/अर्थसंकल्प दि. ३१.०३.२०२५

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, (००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१) (०१) थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्याचे प्रकाशन (कार्यक्रम) (२२०५ ३६२६) या लेखाशिर्षाखाली १६- प्रकाशने या उद्दीष्टाखाली सुधारित अंदाजात रु.२८९.४५ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूबना देण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ ध्या नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन थोर राष्ट्रीय पुरुषांच्या साहित्यांचे प्रकाशन यासाठी २२०५३६२६ मध्ये रु.४९.१० लाख (अक्षरी रु. एकोणपन्नास लाख दहा हजार फक्त) इतका निधी पुनर्वितरणाब्दारे प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरून शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४.	सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.२.२०२५. दि. १७.०३.२०२५ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०२.२०२५ व दि. १७.०३.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क. ४७५/२०२५/व्यय-१४ दि.३१.०३.२०२५च्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०२१४३७२१५३२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT PUNDLIK WAGH

Digitally signed by PRASHANT PUNDLIK WAGH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5599270E38B296E5E5D814FF5976561A3EC66D875AEB425D735E1D7C12140929, cn=PRASHANT PUNDLIK WAGH
Date: 2025.04.02 14:40:23 +05'30'

( प्रशान्त पुं वाघ )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, शालेय शिक्षण, महाराष्ट्र राज्य
४) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
६) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग